लोहगड-विसापूर : व्हाया भाजे आणि कार्ले लेणी

लेखक व छायाचित्रकार : ©विशाल दळवी.

vshldalvi.639@rediffmail.com



प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

esahity@gmail.com

अंतर्मनाचा आवाज ऐकून त्यानुसार जगणारे,

ज्यांना “लोक काय म्हणतील” याची पडलेली नसते

अशा कलंदरांना हे पुस्तक

सन्मानपुर्वक अर्पण

## निकल पडे हैं खुल्ली सडकपर



"यार या रुटीनचा खूप कंटाळा आला आहे रे.... रोज सकाळी ठरलेल्या वेळेत उठायचं, ठरलेल्या वेळेची गाडी पकडायची, ऑफीसच्या ठरलेल्या वेळेत राब राब राबायचं आणि पुन्हा ठरलेलीच गाडी पकडून घरी परत....आणि दुसऱ्यादिवशी पुन्हा तेच...बाकी शनिवार रविवार सोडला तर जगतो काय रे आपण??? काही तरी चेंज हवाय.. पण कुठे जायचं म्हटलं की ज्याप्रमाणे रस्त्यात मांजर आडवं येतं ना तसं साला बजेट आडवं येत....."

मित्रांची मैफिल जमली की अशी वाक्य हमखास कानी पडतात... मग आपण आपल्या परीने जितकी चांगल्या निसर्गरम्य ठिकाणांची नाव सुचवता येतील तितकी सुचवण्याचा प्रामाणिक प्रयत्न करतो... काश्मीर काय, उटी काय, अगदी कुलू मनालीपर्यंत काही काही जण पोचतात. काही जण तर बिचाऱ्याच्या बजेटच्या कन्डिशनकडे कानाडोळा करून सरळ विदेशात जाण्याचा सल्ला देतात... पण म्हणतात ना माणूस दूरवरच्या गोष्टीत इतका रममाण असतो की जवळ पहायची गरजच त्यला भासत नाही.. इतकी सगळी परप्रांतीय जागांची नाव सुचवताना आपण आपल्या मायभूमीला कसं काय विसरतो कोण जाणे??? पण खरंच तुम्हाला असा कधी प्रश्न पडला आणि अगदी कमी बजेटमध्ये आणि ते ही जास्त परिश्रम न घेता बेस्ट वीकेंड एन्जोय करायचा असेल तर सरळ निघा 'धी फोर्ट ऑफ आयर्न' म्हणून प्रसिद्ध असलेल्या 'लोहगडला'....त्याचबरोबर किल्ले विसापूर, भाजे आणि कार्ले लेणी हि तुमचा दिवस बेस्टेम बेस्ट करण्यासाठी सज्ज आहेतच......

हा ट्रेक जेव्हा मी केला तेव्हा माझ्या आयुष्यातला तिसरा आणि सर्वात यादगार ट्रेक ठरला.....का??? कारण या संपूर्ण प्रवासात आम्ही सुमारे ९-१० तास चाललो.... मी आजपर्यंत कोणत्याच गोष्टी ठरवून केलेल्या नाहीत. कारण मी जसं ठरवतो अगदी तसं झाल्याच मला तरी आठवत नाही. त्यामुळे प्लांनिंग वगैरेच्या भानगडीत मी अजिबातच पडत नाही....

१२ एप्रिलला २०१३ या तारखेला आम्ही निघायचं ठरवलं. आता ठरवलं होत जायचं कळसुबाईला. पण गेलो लोहगडला. (आता तुम्हाला कळल असेल माझ प्लानिंग किती 'जबरदस्त' असतं ते...) याला काही प्रमाणात 'ऐन टाइमला टांग देणे' हि मित्रांची पार पूर्वीपासून चालत आलेली प्रथाही कारणीभूत आहे. इतरांनी निघायच्या वेळेस टांग

दिल्याने आता करायचे काय हा यक्ष प्रश्न माझ्यापुढे होता. पण एकदा 'निघायचं म्हणजे निघायचं' या तत्वावर चालणारा असल्याने माझा सह्यसाथी विनायक भोसले याच्याशी सल्लामसलत करून जवळच कुठेतरी जाण्याचे ठरले. आणि शेवटी लोहगडावर शिक्कामोर्तब झाले. त्याचबरोबर जमल्यास किल्ले विसापूर, भाजे आणि कार्ले लेणी पाहण्याचेही ठरले. घाटकोपरवरून निघून आम्ही सरळ कल्याण स्टेशन गाठल. तिथे आमचा अजून एक लंगोटी यार अरुण जाधव आम्हाला येऊन मिळाला. त्याला आम्ही आधीच लोणावळासाठी तीन तिकीट काढून ठेवायला सांगितली होती.

"आपण लोणावळयाला का चाललो आहे?? कळसुबाई लोणावळयात आहे का???"

असा प्रश्न करताना अरुणच्या चेहऱ्यावर अगदी लहान मुलासारखे कुतूहल होते जे त्याच्या बौद्धिक क्षमतेबाबत बरेच काही सांगत होते. मी सुद्धा जास्त काही न ताणता त्याला सरळ सांगून टाकले.

"लोहगड लोणावळयात आहे..."

माझ्या उत्तराने तो अजूनच बुचकळयात पडला. आणि काहीही प्रश्न न करता गुपचूप आमच्या मागोमाग चालू लागला... रात्री १ वाजून ४५ मिनटाची 'भगत की कोठी जोधपुर एक्स्प्रेसने आम्ही पहाटे ३ वाजून २३ मिनटांनी लोणावळा स्टेशनवर उतरलो. आणि हा निसर्गाचा चमत्कारच म्हणावा लागेल की संपूर्ण मुंबई एप्रिलच्या कडक उन्हात भिजून गेली असताना लोणावळयात मात्र हुडहुडी भरणारी थंडी पडली होती...



(सो गया ये जहा, सो गया आसमान, सो गयी सारी मंजिले...... )

एकप्रकारे हिलस्टेशन या नावलौकिकाला साजेश्या हवामानाने आमच स्वागत झालं. अंगावर एक आणि बॅगेत एक अश्या दोन जोडी कपड्यांच्या साथीने निघालो असल्याकारणाने थंडीत कुडकुडतच पहाट होण्याची वाट बघण्याशिवाय दुसरा पर्याय नव्हता. आता पुढे कसं जायचं या बाबत काहीही कल्पना नसल्याने स्टेशनवर कोणी हालचाल करणारा माणूस (स्टेशन वर सगळेच जण गाढ साखरझोपेत होते..) आहे का नाही याचा शोध सुरु झाला. सुदैवाने रेल्वे कॅन्टीन सुरु होत. तिथेच थोडं चहा नष्ट करून घेण्याचं ठरलं. सोबतच तिथल्या कर्मचाऱ्याकडून लोहगडाबाबत थोडी माहितीही काढून घेतली. आम्हाला लोणावळ्याहून पुण्याला जाणारी ५ वाजताची पहिली लोकल ट्रेन येपर्यंत वाट बघायची होती. मग काय टाईमपास करण्याचा सर्वोत्तम मार्ग म्हणजे जुन्या आठवणीत रमणे होय. आम्ही तिघेही सुमारे ६ -७ वर्ष एकत्र शिकत होतो. त्यामुळे गप्पांना चांगलाच रंग

चढला. मधून मधून आमच्या जोरजोरात हसण्याने स्टेशनवरची शांतता भंग व्हायची. मग बाजूला झोपलेला हळूच एकाने आमच्याकडे नजर टाकली. त्याच्या नजरेतले भाव जणू तो आम्हाला वेडा समजत आहे किंवा हे का दुसऱ्यांच्या झोपेवर उठले आहेत, अश्याच काहीश्या प्रकारचे होते आणि कूस बदलून तो पुन्हा झोपेच्या स्वाधीन झाला...

आठवणींच्या हिंदोळयावर झुलताना वेळ कसा गेला कळलेच नाही. मग ५ वाजताची पुण्याला जाणारी पहिली लोकल पकडून आम्ही पुढच्याच स्टेशनला म्हणजे 'मळवलीला' उतरलो.




सकाळची थंडी अंगावर जरी शिरशिरी आणत असली तरी मी तिचा पुरेपूर आस्वाद घेत होतो. स्टेशनच्या बाहेरच असणाऱ्या टपरीवर जाऊन आपण योग्य मार्गावर आहोत याची खात्री करून घेतली. खरंतर लोहगड किल्ला हा गड चढणे किंवा डोंगर चढणे या गटात मुळीच मोडत नाही. मळवलीच्या पूर्वेकडून 'मुंबई पुणे एक्सप्रेस हायवे' पादचारी पुलावरून पार केल्यानंतर आपण एका डांबरी रस्त्यावर येतो आणि पुढे हाच रस्ता सरळ लोहगडवाडी पर्यंत गेला आहे. मळवली ते लोहगडवाडी हे अंतर ७ किमी आहे. आमच्याजवळ खूप वेळ असल्याने आणि इतक्या सकाळी कोणतेच वाहन लोहगडवाडी पर्यंत

जाण्यास उपलब्ध नसल्याने आम्ही हे अंतर चालत जाण्याचे ठरवले. पण आम्हाला काय माहीत की या पुढील सगळा प्रवास हा पायीच करायचा आहे!!!!

(लोहगडाकडे जाणारा नागमोडी रस्ता....)



इतक्या सकाळी थंडीतही न चुकता गावकरी आपली काम करण्यास सरसावले होते. ते पाहून आम्हालाही जोश आला आणि हळूहळू आमचा प्रवास सुरु झाला. जसजस आम्ही अंतर कापीत होतो तसतस उंचीही कापली जात होती. आणि निसर्ग आमच्यासमोर उलगडू लागला.

एका ठिकाणी थोड वेळ थांबून आम्ही संपूर्ण परिसर न्याहाळला. धुक्याच्या दुलईत स्वताला लपेटून घेतलेल्या निसर्गाला सुर्यदिवांची कोवळी किरणे हळूच उठवत होती. ते नयनरम्य दृश्य पाहून इथे आल्याचं सार्थक झाल्यासारखं वाटलं. पण ही तर फक्त सुरवात होती अजून बराच पल्ला गाठायचा होता...

वाटेतच भाजे लेणी लागतात. जी आम्ही परतताना बघायचं ठरवलं... दूरवरून भाजे लेणी पाहिली की डोंगरात इवलं इवलं दिसणारं ते काय आहे....याच कुतूहल जागृत होत. त्याचबरोबर विसापूर किल्ला पण बाहेर डोकाऊ लागतो. जणू तो सांगतो की लोहगडाआधी माझा मान आहे...



(दूरवरून झूम करून टिपलेला...विसापूरच्या कुशीत लपलेल्या भाजे लेण्यांचा फोटो...)

दूरवरूनच ग्रामपंचायत लोहगडवाडी हा फलक नजरेस पडला. आणि सकाळी ७ वाजता आम्ही लोहगडवाडीत दाखल झालो. बाजूलाच ‘हिंदवी स्वराज्य संस्थापक श्रीमंत छत्रपती शिवाजी महाराज’ यांच छोटेखानी मंदिर आहे अस म्हटलं तरी वावग ठरणार नाही. त्यात महाराजांचा सिंहासनारूढ पुतळा आहे. ते मंदिर पाहिल्याक्षणीच हात आपोआपच जोडले गेले. आणी मान झुकली गेली. पहिल्यांदाच ट्रेकिंग करणाऱ्या अरुण तर डोळे मिठून उभा होता. हीच तर जादू आहे महाराजांच्या प्रतिभेची... त्यांना पाहताक्षणी महाराजांचा पराक्रम डोळ्यासमोर दिसू लागतो...आणि ‘आजही जर महाराज असते तर....’ या फक्त भावनेनेच अंग रोमांचून उठते. महाराजांचे पदस्पर्श करून आम्ही लोहगडावरजाण्यास सज्ज झालो..



# लोहगड :



मुंबई आणि पुणे या दोन शहरांना एका तराजूत तोलण्याचा प्रयत्न अनेकवेळा केला जातो. पण स्वराज्याचं दान मात्र पुण्याच्याच पदरात भरभरून पडलं हेही तितकंच खरं. त्याबाबतीत मुंबईकरांना पुण्याचा हेवा वाटण साहजिकच आहे. सिंहगडानंतर पुणेकरांना दुसऱ्या कुठल्या गडाबद्दल 'लय भारी' अभिमान असेल तर तो लोह्गडाबद्दल...

(संपूर्ण गड त्या कॅमेऱ्यात समावावून घेण म्हणजे अतिशय कठीण काम...)

लोहगडाची समुद्रसपाटीपासूनची उंची १०३३ मिटर (३३८९ फूट) इतकी आहे. लोहगड अंदरमावळ आणि पवनमावळ यांच्यातील पर्वतरांगेत स्थित आहे. अतिशय मजबूत, दुर्जेय, बुलंद आणि अशी लोहगडाची ख्याती आहे. काही इतिहासकारांच्या म्हणण्यानुसार सुमारे सत्तावीसशे वर्षांपूर्वी या किल्ल्याची निर्मिती झाली असावी. (म्हणजेच भाजे आणि बेडसे लेण्यांच्याही पूर्वी!!!) सातवाहन, चालुक्य, राष्ट्रकुट, यादव आणि त्यानंतर निजामशाही, आदिलशाही या राजवटी पाहिल्यानंतर १६५७ साली छत्रपती शिवरायांनी लोहगडला स्वराज्यात सामील करून घेतले. पण पेशव्यांना मात्र हा किला फार काळ टिकवता आला नाही आणि इंग्रजांनी १८१८ मध्ये लोहगड इंग्रज राजवटीत विलीन केला.

लोहगडावर कोणत्याही प्रकारची चढाईची आवश्यकता भासत नाही. सरळ पायऱ्यावरून सर्पाकार मार्गाने जात राहायचं. आता हा मार्ग सर्पाकार यासाठी बनवला गेला की जेणेकरून किल्ल्यावरच्या पहारेकऱ्यास बाहेरून गडावर येणाऱ्या माणसावर लक्ष ठेवता येईल.

गडावर जाताना सलग चार प्रवेशद्वार पार करावे लागतात. सर्वप्रथम आम्ही गणेश दरवाज्यात प्रवेश केला. त्यानंतर येतो तो नारायण दरवाजा. हा दरवाजा नाना फडणवीसानी बांधला. इथे एक भुयार नजरेस पडले ज्याचा उपयोग भात आणि नाचणी साठवून ठेवण्यासाठी करण्यात यायचा.



त्यानंतर नजरेस पडला तो सर्वात प्राचीन हनुमान दरवाजा. गडावर अनेक बुरुजही नजरेस पडतात. सर्वोच्च बुरुजावरून गडावर येणारी संपूर्ण वाट न्याहाळता येते.



त्या भल्या चिरेबंदी पायऱ्या चढताना धाप लागत होती. पण प्रत्येक प्रवेशद्वारात पाउल टाकल्यावर त्याचं भव्यदिव्य स्वरूप पाहून सगळा थकवा क्षणात नाहीसा व्हायचा आणि आम्ही गुंगून जायचो त्या दगडी सौंदर्यात.. शेवटी आम्ही पोहचलो गडाच्या मुख्य आणि शेवटच्या दरवाज्यात 'महादरवाज्यात'.



या दरवाज्यावर हनुमानाची मूर्ती कोरलेली आढळते. इथून पुढे जवळच एक दर्गा लागतो. दर्ग्याच्या बाहेर चुना बनवण्याची घाणी आहेत. बाजूलाच लोहारखान्याचे भग्न अवशेष आढळतात.



अजून थोडी बाजूला नजर टाकली की सिमेंटच्या चौथऱ्यात बसवलेली तोफ नजरेस पडते. उजवीकडे ध्वजस्तंभ आहे त्याच्या पुढे लक्ष्मीकोठी आहे. आत अनेक खोल्या अजूनही चांगल्या स्थितीत आहेत. नाईट ट्रेक करणाऱ्यांसाठी इथे राहण्याची सोय होऊ शकते. दर्ग्यापासून काही अंतरावरच शिवमंदिर आहे. (एकाच गडावर दोन कट्टर धर्मांचा मिलाप!!!!)



(शिवमंदिर आणि ध्वजस्तंभ...)

शिवमंदिरापासून पुढे सरळ चालत गेल्यावर एक भल्या मोठ्या अष्टकोनी तळ्याचे दर्शन होते. त्याचाच बाजूला गडावर एकमेव पाण्याची सोय असलेल 'टाक' आहे.



पुढे पंधरा ते वीस मिनटे चालल्यावर आपण आधीच्या तळयाला भल मोठ समजायला जराशी घाई केल्याचं लक्षात आलं. कारण इथे आहे नाना फडणविसानी बांधलेलं सोळाकोनी तळं...



याच्या पुढे वाट जाते ती विंचूकाटयाकडे. या वाटेवर वाड्यांचे अवशेष पाहायला मिळाले. विंचूकाट्यावर जाण्यासाठी एक टप्पा खाली उतरून पलीकडे गेलो. गडावरून पहिले असता हा भाग विंचवाच्या नांगीसारखा दिसतो म्हणून यास विंचूकाटा म्हणतात असे कळले.



विंचूकाटा म्हणजे डोंगराची तब्बल पंधराशे मीटर लांब आणि तीस मीटर डोंगराची सोंड आहे. इथून सभोवतालचे संपूर्ण दृश्य न्याहाळता येते. विंचूकाट्याचा उपयोग सभोवतालच्या परिसरावर लक्ष ठेवण्यासाठी करण्यात येत असावा. खाली पहिले तर दाट जंगलाशिवाय काहीच नजरेस आले नाही.

लोहगडावरून प्रशस्त असा प्रदेश नजरेचे पारणे फेडतो.



लोहगडावरून डायरेक्ट विसापूरवर पोचण्यास वाट आहे का ते बघण्यास आमची सुरवात झाली. पण तशी कोणतीच वाट नाही असे गडावर आलेल्या गावकऱ्यांकडून कळले... मग काय गडावरच थोडा वेळ पहुडलो.



त्या सकाळच्या कोवळया उन्हात मातीत झोपण्यात वेगळीच मज्जा होती. लहानपणी आई उन्हात नागड उभ करायची..तेव्हा फार कंटाळा यायचा आणि आज तीच गोष्ट मी प्रत्यक्षात करू शकत नसताना हवीहवीशी वाटत होती...ती सूर्याची गोंडस कोवळी किरण एखाद्या सुसाट सुटलेल्या बाणाप्रमाणे अंगावर झेलावीत आणि सार तन मन शुद्ध कराव इतकीच स्तुप्त इच्छा मनात होती....पण वेळ कधी गेला कळलच नाही.. एव्हाना साडेनऊ वाजून गेले होते आणि आम्हाला घाई करावी लागली...कारण विसापूर वाट पाहत होता न आमची..

गडावरून उतरल्यावर विसापुरला कसं जायचं ह्या प्रश्नाच उत्तर मिळवायचं होत. पण गावकऱ्यांच्या म्हणण्यानुसार काही दिवसापूर्वीच किल्ल्याचा काही भाग कोसळला. त्यामुळे चढण्यास योग्य असा मार्ग आणि स्थिती नव्हती. गावकऱ्यानी तर आम्हाला सरळ सरळ विसापूरला न जाण्याचाच सल्ला दिला आणि आम्हा तिघांचीही थोबाड हिरमुसली. मी नजरेनेच विनायक आणि अरुणाला विचारलं की बाबा आता का करायचं??? पण त्यांच्या मनात काही वेगळच होत. इतक्या जवळ असूनही गडाला भेट न देणे म्हणजे आपल्याला आवडणारी मुलगी हातात गुलाबच फूल घेऊन उभी असताना आपण तिच्याकडे सरळ पाठ फिरून निघून जायचं..का तर तिचा बाप मार्गात आडवा येतो म्हणून...छे हे शक्यच नाही...शिवबांच्या मावळ्यांनी कधी कशाची परवा केली नाही.. मग त्यांच्याच पदचिन्हांवर चालणारे आम्ही माघारी जाणे म्हणजे पळपुटेपणा...आणि आम्ही तिघांनी नजरेनेच एकमेकांना खुणावले आणि आमची स्वारी निघाली विसापुरकडे...



लोहगडवाडीतून विसापूर अवघ्या दीड किमीच्या अंतरावर वसलेला आहे. विसापूर किल्ला लोणावळा घाटाचे संरक्षण करतो. इतिहासात या किल्ल्याचे तसे फारसे महत्त्व आढळत नाही. १६८२ मध्ये जेव्हा शहाबुद्दीन या मोगल सरदाराला मराठे लोहगडाजवळ असल्याचे कळले तेव्हा मराठ्यांनी पाठशिवणीचा खेळ सुरु केला आणि ते विसापुरवर आश्रयास गेले. १८१८ ला जेव्हा इंग्रज मावळ प्रांतात आले तेव्हा त्यांनी सर्वप्रथम विसापूर जिंकला आणि दुसऱ्याच दिवशी मराठ्यांनी शरणागती पत्करली आणि ते लोहगड सोडून गेले.

लोहगडवाडीतून भाजे आणि मळवली गावी जाणाऱ्या डांबरी रस्त्याने निघाल्यावर काही अंतरावर उजवीकडे एक कच्चा रस्ता जातो याच कच्च्या रस्त्याने पुढे गेल्यास एक छोटीशी पायवाट वर विसापुरकडे जाते. मात्र आम्हाला ती पायवाट शोधण्यास तब्बल अर्धा तास लागल कारण गडाचा भाग कोसळल्याने सगळीकडे दगडांचे आणि मातीचे थर साचले होते. अखेर पायवाट मिळाल्यावर आम्ही त्याच दगडांवरून सरळ पर्वा न करता चढत सुटलो. मातीच्या ढिगाऱ्यामुळे आणि ठिसूळ दगडांमुळे पाय घसरत होते. धुळीने आमचे कपडे आणि चेहरे माखले होते पण आम्हाला तर लवकरात लवकर गडावर पोहचायचे होते म्हणून कसलाही विचार न करता आम्ही नॉनस्टोप चढत राहिलो आणि अखेर माथ्यावर पाउल टाकल्यावर जीवात जीव आला. गडावर जास्त काही पाहण्यासारखे नाही. दोन गुहा आहेत ज्यात ३०-४० जणांच्याराहण्याची सोय होऊ शकते. पाण्याची तळी आणि एक मोठ 'जात' इतकाच काय तो विसापुरचा संसार....

पण माथ्यावरून दिसणार सुंदर दृश्य ती सारी उणीव भरून काढतो...





(किल्ल्याचा काही दिवसांपूर्वीच ढासळलेला भाग)

हळूहळू सुर्यदिवांच्या कोवळया उनांचे रुपांतर तप्त अग्निबानांत होऊ लागल्याने आम्ही शक्य तितक्या लवकर भाजे गाव गाठण्याचा निर्णय घेतला. कारण आम्हा दोघांपेक्षा अरुण काय तो भाजे लेणी पाहण्यास जास्त उत्सुक होता... पुन्हा एकदा विसापुरहून अर्ध्या-पाऊण तासाची पायपीट करून आम्ही भाजे आणि मळवलीकडे जाणाऱ्या डांबरी रस्त्यावर आलो.. रस्त्यावर पूर्णपणे शुकशुकाट होता आणि एखाद्या वाहनाने जाऊन लवकरात लवकर भाजे लेणी गाठण्याच्या आमच्या मनसुब्यावर पाणी फिरले...(आणि हो आमच्याजवळचे पाणी हि संपुष्टात आले होते..) आमच्या नशिबात आज वाहनाने फिरण्याचा योगच नव्हता मुळी...अखेर विधिलीखीताप्रमाणे आम्ही चालण्यास सुरवात केली. सकाळच्या उन्हात चालणे म्हणजे एक नितांत सुंदर अनुभव पण दुपारच्या रणरणत्या उन्हात चालणे (पायपीट हा शब्द उत्तम) म्हणजे “एक भयंकर चटकेदार अनुभव”.........

सुमारे दीड तास बिचाऱ्या पायांवर आणि शरीरावर जुलूम केल्यानंतर आम्ही भाजे या गावी पोचलो. सकाळी आपण याच रस्त्याने भराभर हसत खिदळत गेलो हे मानायला माझ मन मुळीच तयार नव्हत. माझ्याबरोबरच विनायक आणी अरुण यांचेही हाल काही वेगळे नव्हते. (पण कोणाच्या तोंडावर ‘वैताग’ दिसेल तर शप्पथ!!!) रस्त्याच्या कडेला असलेल्या घरात जाऊन शेवटी पाणी मिळेल का हे विचारण्याची हिम्मत करायला मात्र आमच्यापैकी कोणीही तयार होत नव्हत. (पुण्यात होतो न आम्ही......पुणेकरांशी पंगा कोण घेणार???) सरतेशेवटी अरुणने पुढाकार घेऊन पाण्याची सोय केली आणि मन तृप होईपर्यंत ते ‘अमृत’ आम्ही घाटघटा प्यायलो, तेव्हा कुठे बर वाटल...५ मिनट चालाल्यावरच भाजे लेणी हा फलक दिसला आणि अरुणने तिकडे धूम ठोकली.....

# भाजे लेणी :






भाजे लेणी हि विसापूरच्याच बलदंड कुशीत सामावलेली आहेत. या लेण्या बघण्यासाठी पायऱ्या चढून जाव्या लागतात ज्या पुरातत्व विभागाकडून बांधण्यात आल्या आहेत. हि वास्तू भारतीय पुरातत्व खात्याच्या अखत्यारीत असल्याने लेणी पाहण्यासाठी ५ रुपयाचे शुल्क आकारले जाते.


भारतीय पुरातत्व सर्वेक्षण ARCHAEOLOGICAL SURVEY OF INDIA
₹ 5/-
OTHER TICKETED MONUMENTS OF INDIA


Govt. of India
भारत सरकार
Please Buy the Ticket Here
ADMISSION FEE RS. 5.00/- (FIVE ONLY EACH)
FOR FOREIGNER RS. 100.00
VIDEO FILMING RS. 25/- FOR EXTERNAL
NON COMMERCIAL PURPOSE
टिकट घर
कृपया टिकट यहाँ से खरिदीये ।
प्रवेश शुल्क रु. ५.०० (पाँच रुपये) प्रति टीकट
विदेशी पर्यटकोंके लिए रु. १००.००
अधिक्षक पुरातत्वविद
भारतीय पुरातत्व सर्वेक्षण मुंबई


भाजे गुंफासमूह
भारतीय पुरातत्व सर्वेक्षण
मुंबई विभाग, मुंबई

पायऱ्या चढून गेल्यावर समोरच दिसते ते भव्य चैत्यगृह. आणि त्याच्या बाजूला पसरले आहेत एकवीस विहार. साधारणपणे इसवी सन पूर्व दुसऱ्या शतकात भाजे लेणी कोरण्यास सुरवात झाली आणि त्यानंतर सुमारे ७०० वर्षे शिल्पकार अविरतपणे हातात छिन्नी आणि हातोडा घेऊन झटत होते..आणि त्या सर्व शिल्पभक्तांच्या कष्टातून साकारली भाजे लेणी... शिल्पप्रेमिंसाठी भाजे लेणी म्हणजे एक पर्वणीच ठरते. मला तर फार काही काळात नाही शिल्पांबद्दल किंवा लेण्यांबद्दल, पण पाहताक्षणीच मी चाटच पडलो. आजकाल तंत्रज्ञानाच्या सहायाने अनेक शिल्प उभी केली जातात. पण फक्त छिन्नी आणि हातोडा वापरून अतिशय रेखीव, तंतोतंत आणि सुरेख, नक्षीदार, सुंदर वास्तू बनवण कलियुगात तरी कोणालाच शक्य नाही..... चैत्यागृहाच्या दक्षिणेस पाण्याचा स्त्रोत आहे. चैत्यागृहाला लाकडी छत आहे आणि यावर ब्राम्ही लिपीतील लेख आढळतात. चैत्यागृहात सत्तावीस खांब आणि एक स्तूप आढळतो.

भाजे लेण्यातील सुर्यलेणे अतिशय प्रसिद्ध आहे. यातील नक्षीकाम आणि कोरीवकाम खरच लाजवाब आहे. सर्व परिसर डोळे भरून पाहून घेतल्यानंतर आम्ही वर अससाऱ्या लहानश्या लेण्यांमध्ये जाऊन बसलो इथून समोरच दृश्य अप्रतिम दिसत होत. त्या लेण्यांमध्ये एक प्रकारचा गारवा होता.



सकाळपासून आमची साथ देणाऱ्या पायांना हि थोड आराम हवा म्हणून सरळ जमिनीवर आडवेच झालो. शरीर अतिशय हलक हलक वाटत होत. डोळे हलकेच बंद होण्याचा प्रयत्न करत होते. जसं की कोणी तरी आपल्यावर जादू करतय असा तो भास होता... त्या लेण्यांतील शांत वातावरण आणि सोबतीला असलेला गारवा आणि वाऱ्यामुळे तिथून हलण्याची अजिबातच इच्छा होत नव्हती. माझ्या डोक्यात तर तिथेच रात्र घालवण्याचा विचार चालू होता. पण विनायकने रात्रीच्या थंडीची आठवण करून देताच तो विचार लगेच झटकला. आणि आम्ही निघालो आमच्या शेवटच्या डेस्टिनेशनकडे.. कार्ले लेण्यांना भेट द्यायला....



पण त्याआधी सकाळपासून सुमारे ६-७ तास चालून थकलेल्या शरीराला रिचार्ज करण आणि 'पोटातल्या कावळयांना' शांत कारण गरजेच होत. पण २ वाजून गेल्याने जेवायला मिळण तर मुश्कील होत अखेर एका हॉटेलात मिसळ पाव मिळेल हि पाटी वाचली आणि मिसळ पाव वरच 'कावळयांना' शांत करण्याचे ठरले. (जेवायचे ठरले).

भाजे गावाहून मळवली स्टेशन फक्त १ किमीवर असल्याने आम्ही काही वेळातच तिथे पोचलो. लोहगड, विसापूर आणि भाजे लेणी मळवलीच्या पूर्वेला आहेत पण कार्ले लेणी मात्र मळवलीच्या पश्चिमेस आहेत. आम्ही स्टेशनवरून पश्चिमेस गेलो. आता नेहमीप्रमाणे मार्ग विचारण्यास सुरवात झाली आणि कळले की चालत गेलो तर कमीत कमी २ तास हवेत... मग बाजूलाच उभ्या असलेल्या रिक्शावाल्याला १५० रुपयात पटवून आम्ही अवघ्या २० मिनटात कार्ले (विहेरगाव) गावात पोचलो... (सकाळी ५ वाजल्यापासून फक्त चालून चालून थकलेल्या आमच्या शरीराला अखेर सकाळपासून न लाभलेल्या वाहनाच सुख लाभल...!!!)

# कार्ले लेणी :




कार्ले हे ठिकाण खरतर प्रसिद्ध आहे आई एकविरेच देवस्थान म्हणून. दर सुट्टीच्या दिवशी भाविक इथे मोठ्या प्रमाणावर एकविरेच्या चरणाशी लीन होण्यास येतात. आम्ही गेलो तेव्हाही रविवार असल्याने दर्शनासाठी भक्तांची रीघ होती त्यामुळे बाहेरूनच आई एकविरेला हात जोडून तिचा आशीर्वाद घेतला आणि आमचा मोर्चा वळवला लेण्यांकडे...


कार्ला लेणी
ही बुध्द धर्मीय लेणी इसवी सनापुर्वी सुमारे
पहिल्या शतकात खोदलेली आहे. येथील
विस्तीर्ण चैत्यगृह हीनयान पंथीय चैत्यगृहापैकी
एक सर्वोत्तम म्हणून प्रसिध्द आहे. त्याच्या भव्य
प्रवेशद्वाराच्या बाजूस एक विशाल सिंहस्तंभ असुन
आतील बाजूस अर्ध गोलाकृती गवाक्ष, उत्कृष्ट
शिल्पकृती आणि कोरीव मुर्ती आहेत.
येथील बुध्दाच्या मुर्ती मात्र महायान पंथीयांनी नंतर
(इ.स. ५ व्या किंवा ६ व्या शतकामध्ये) कोरल्या
असुन त्या मुळच्या कल्पनेस धरुन नाहीत. या लेण्यात
ब्राह्मी लिपीमध्ये कोरलेले अनेक शिलालेख असुन त्यात
लेणी खोदण्यासाठी ज्यांनी दान दिले त्यांचा निर्देश
केलेला आहे. त्यातील एका लेखात हे चैत्यगृह
जम्बुब्दीपातील (भारतातील) एक अद्वितीय
शैलगृह म्हणून वर्णिले आहे.
भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण विभाग

कार्ले गुंफा या बोरघाटात वसलेल्या आहेत. इसवी सन पूर्व पहिल्या ते पाचव्या शतकांदरम्यान हि लेणी खोदली गेली असावीत. भाजे लेण्यांप्रमाणेच कार्ले लेणी हि भारतीय पुरातत्व खात्याच्या अखत्यारीत आहेत. ईथेही लेण्या पाहण्यासाठी ५ रुपये प्रवेशशुल्क द्यावे लागते. बुद्धाच्या जीवनावर आधारलेल्या दगडी गुंफाचा समूह इथे पाहायला मिळतो.





यात एक चैत्यगृह आणि सोळा लेण्यांचा समावेश आहे. चैत्यगृह हे आकाराची भव्यता आणि शैलीची प्रौढता दर्शवते. सभामंडपात अनेक प्रसंग कोरलेले आढळतात.

कार्ले लेण्यांचा समूह पाहताना प्रत्येक पावलागणिक चेहऱ्यावर कुतुहलाचे भाव उमटतात. आणि आपसूकच त्या अप्रतिम लेणी सौंदर्यात आपण स्वतालाच हरवून बसतो.



अशाप्रकारे आमचा प्रवास संपला. (अजून घरी पोचायचे तेवढ बाकी होत) एका दिवसात आम्ही चार अप्रतिम ऐतिहासिक प्राचीन स्थळांना भेटी दिल्या. या भेटी शॉर्ट पण खरच स्वीट होत्या. खरच भरून पावल्याच समाधान मनाला मिळाल. पुढे मळवलीला आम्ही चालतच गेलो. पण यावेळी आमचाच तसा आग्रह होत. का??? तर आम्ही आतापर्यंत नाही म्हटलं तरी ८ तास फक्त चाललो होतो आणि कार्ल्याहून मळवलीला पोचण्यास अजून २ तास तरी लागणार होते.. मग का नाही हा ट्रेक यादगार बनवायचा १० तास चालण्याचा पराक्रम करून...??? बस्स इतका साधाच स्वार्थ होत आमचा त्यामागे..अजून काहीच नाही.........

{छोटीशी नोट : या पुढचा मुंबई पर्यंतचा आमचा प्रवास सुखाने झाला असेल, असा जर तुम्ही विचार करत असाल तर खरच तसं काही झालं नाही...देव आम्ही घेतलेल्या कष्टांमुळे अजूनही प्रसन्न झाला नव्हता म्हणूनच की काय लोणावळयापासून ठाणे स्टेशनपर्यंत आम्हाला गर्दीत श्वास कोंडून जायची वेळ येईपर्यंत उभ्यानेच प्रवास करावा लागला.... }

तर असा झाला आमच्या गिरीनाद ग्रुपचा ट्रेक प्रवास...थोडा कष्टप्रद पण साऱ्या कष्टांच शेवटी चीज झाल्याच समाधान मात्र नक्कीच लाभल... खरच जर या रोजच्या रुटीनने कंटाळला असाल. आणि एक आयुष्यभर लक्षात राहील अशी आठवणींची शिदोरी हवी असेल तर एकदा या चार प्राचीन ऐतिहासिक वास्तूंना नक्कीच भेट द्या...

कसे पोचाल???

रेल्वने मुंबईहून लोणावळयास पोचावे. तेथून लोकल ट्रेनने पुढच्याच स्टेशनला 'मळवलीला' उतरावे. पुढे मळवलीच्या पूर्वेहून लोहगडवाडीला चालत किंवा गाडीने पोचता येईल. येताना विसापूर आणि भाजे लेण्याना भेट द्यावी. आणि शेवटी वेळ असल्यास स्टेशनच्या पश्चिमेस असलेल्या जगप्रसिद्ध कार्ले लेण्यानाहि भेट देण्यास हरकत नाही....

खाजगी वाहनाहे गेल्यास प्रवास नक्कीच सुखकर होईल यात शंकाच नाही......



(पहिलाच ट्रेक असताना अगदी कसलीही कुरकुर न करता आपल्या मित्रांच्या भरवशावर

बिनधास्त असणारा जिवलग मित्र ‘अरुण जाधव’)

# ई साहित्य प्रतिष्ठान

दक्षिण भारत हा भव्य मंदिरांसाठी प्रसिद्ध आहे. एका एका मंदिराची उंची, भव्यता आणि श्रीमंती पहात आणि ऐकत रहावी. म्हणून तर पर्यटक दक्षिणेची मंदिरं पहायला जातात. दक्षिणात्य लोकांना या मंदिरांचा फ़ार अभिमान आहे. काहीसा गर्वही. असायलाच हवा.

पण ती मंदिरं उत्तरेहून आलेल्या आक्रमक वाटळीपासून सुरक्षित राहिली याचं श्रेय मात्र मराठी लोकांनी अभिमानाने घ्यायला हवं. मुघलशाही, कुतुबशाही, आदिलशाही अशा बड्या बड्या शाह्यांशी एक हाती मुकाबला करून आम्ही मराठ्यांनी तंजावर ते पेशावर मराठेशाही स्थापन केली. आमच्या या किल्ल्यांनी, आमच्या पूर्वजांनी, एक संरक्षक भिंत उभी केली म्हणून दक्षिण सुरक्षित राहिली. सर्वच मराठी जण लढाईला गेले असतील असे नाही. पण काहींनी रसद पोचवली असेल. आणि काहींनी घाम गाळून दणकट किल्ले बांधले असतील. थोडे थोडके नाही, तिनशेहून अधिक कडक किल्ले. शोभेचे नाही. रणकंदनी किल्ले. आमनेसामनेच्या युद्धात जिंकणं अशक्य असे किल्ले. प्रत्येक किल्ल्याची गुंतागुंतीची रचना. प्रत्येक किल्ल्याची वेगवेगळी शक्तीस्थानं. प्रत्येक किल्ला एक ऊर्जास्थान. एक शक्तीस्थळ. मुडद्यासारख्या मनालाही उभारी देईल असं. या किल्ल्यांचा आम्हाला गर्व आहे. हे किल्ले हे आमच्या तरुणांसाठी मंदिरंच आहेत. भवानीची शक्ती मंदिरं.

ई साहित्य प्रतिष्ठानने या प्रत्येक शक्तीस्थळाचं स्वतंत्र ई पुस्तक बनवण्याचं काम हाती घेतलं. म्हणता म्हणता हजार हात पुढे सरसावले. नचिकेत जोशी, माधुरी नाईक, अरविंद नाईक, पंकज घारे, ओंकार ओक, अशा तरूण लेखकांच्या फ़ळीत आता भास्कर नारकर, संकल्प चौधरी, विशाल दळवी असे ताज्या दमाचे शिलेदार सामिल होत आहेत. या पुस्तिकांतून नव्या ट्रेकर्सना मार्गदर्शन तर होतेच पण विदेशात असलेल्या किंवा वयानुरूप

ट्रेकिंगपासून दूर असलेल्यांना पुनःप्रत्ययाचा आनंद मिळतो. त्यामुळे या पुस्तिका फ़ार आनंदाने वाचल्या जातात.

या पुस्तिका प्रत्येक मराठी माणसापर्यंत पोहोचल्याच पाहिजेत. आम्ही त्यासाठी लाखों लोकांना या मेलने पाठवतो. पण कोट्यवधी मराठी लोकांपर्यंत त्या न्यायच्या तर त्यासाठी हजार हात हवेत. तुमच्या ओळखीच्या तरूण मंडळींना या अभियानात सामिल करून घ्या. त्यांचे ई मेल पत्ते कळवा. त्यांना पुस्तके द्या. आता ही पुस्तके मोबाईलवरही वाचता येतात. www.esahity.com वरून डाऊन लोड करा. शिवाय नवनवीन apps येत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठानचं app लवकरच येत आहे.

मराठी ही केवळ भाषा नाही. ती एक वृत्ती आहे. एक परंपरा. एक वारसा. त्याचं जतन करूया. सर्व राजकारणापासून दूर राहून. पुढच्या पिढ्यांना या समृद्ध वारशाचा लाभ घेऊ द्या. त्यासाठी पैसे नकोत. फ़ार वेळही नका देऊ.

कृपया आपल्या ओळखीच्या दहा मराठी मंडळींचे ई मेल पत्ते कळवा. आमचे VIP सभासद होण्यासाठी एवढंच पुरेसं आहे.

टीम ई साहित्य

esahity@gmail.com



